# विताली बिआंकी

# पहिलो शिकार





अंगणातील कोंबड्यांचा पाठलाग करायचा कुत्र्याच्या पिल्लाला कंटाळा आला.

"आता जंगली प्राण्यांच्या आणि पक्ष्यांच्या शिकारीलाच जावं!" त्याने मनाशी विचार केला.

पिल्लाने फाटकामधून बाहेर उडी मारली आणि मैदानात ते धावले.

जंगली प्राण्यांनी, पक्ष्यांनी व कीटकांनी पिल्लाला पाहिले. प्रत्येकजण मनाशी विचार करू लागला:

लाव पक्षी मनाशी म्हणाला: "मी त्याला हूल देईन!"

सुतार पक्षी मनाशी म्हणाला: "मी त्याला गोंधळून टाकीन!"

सर्पकंठी काळी चिमणी मनाशी म्हणाली: "मी त्याला घाबरवीन!"

पाल मनाशी म्हणाली: "मी त्याच्या तावडीतून पळून जाईन!"

टोके, फुलपाखरे आणि नाकतोडे यांनी विचार केला: "आम्ही त्याच्यापासून लपून बसू."

"आणि मी त्याला पळवून लावीन!" चढाईखोर शेणकीडा म्हणाला.

"आम्ही सगळे आपापल्या परींनी स्वतःचे रक्षण करू शकतो," ते सगळे मनाशी म्हणाले.

दरम्यान पिल्लू तळ्यापाशी गेले. तेथे त्याने पाहिले: बोरूंपाशी गुडघाभर पाण्यात एक पाय वर धरून लाव पक्षी उभा होता.



"आत्ता पकडतो त्याला!" पिल्लू मनाशी म्हणाले व झेप घेण्याची त्याने तयारी केली.
लाव पक्ष्याने पिल्लाला पाहताच बोरूंमध्ये दडी मारली.
तळयावर वाऱ्याची झुळूक आली. झुळुकेने बोरूंना हलविले. बोरू डोलू लागले

मागे-पुढे,
मागे-पुढे.

पिल्लाच्या डोळ्यांसमोर पिवळट-तपकिरी रेषा डोलू लागल्या

मागे-पुढे,
मागे-पुढे.



लाव पक्षी बोरूंमध्ये उभा होता. त्याने स्वतःचे अंग ताणले व बोरूप्रमाणेच तो सडपातळ दिसू लागला. त्याच्या शरीरावर पिवळट-तपकिरी रेषा होत्या.

उभ्या उभ्या तो डोलत होता

मागे-पुढे,
मागे-पुढे.

पिल्लाने डोळे ताणताणून पाहिले, पण लाव पक्षी बोरूंमध्ये दिसेना.



"असो! लाव पक्ष्याने तर मला हूल दिली," पिल्लू मनाशी म्हणाले. "आता ह्या रिकाम्या बोरूंमध्ये कशाला उड्या मारू? त्यापेक्षा दुसऱ्या एखाद्या पक्ष्याला पकडावं!"

धावत धावत पिल्लू एका टेकाडावर पोहोचले. त्याने पाहिले: जमिनीवर सुतार पक्षी बसला होता व स्वतःच्या तुऱ्याशी खेळत होता. कधी तुरा फुलवायचा, तर कधी मिटवायचा.

"आत्ता ह्या टेकाडावरून त्याच्यावर झेप मारतो!" पिल्लू मनाशी म्हणाले.

पण सुतार पक्षी एकदम जमिनीसरशी सपाट आडवा झाला, त्याने पंख पसरले, शेपटी पिसारली व चोच वर केली.

पिल्लाने पाहिले: पक्षी तर नाहीच. जमिनीवर रंगीबेरंगी कापडाचा तुकडा पडला आहे आणि त्यातून एक वाकडी सुई वर डोकावतेय.

पिल्लू गोंधळून गेले: सुतार पक्षी गेला कुठे?

"अरेच्चा, ह्या रंगीबेरंगी कपड्याच्या तुकड्यालाच मी सुतार समजलो काय? त्यापेक्षा पटकन एखादी छोटी चिमणी पकडावी!"

पिल्लू धावत धावत एका झाडापाशी आले व त्याने पाहिले: फांदीवर एक छोटी सर्पकंठी चिमणी बसली होती.

पिल्लू तिच्याकडे झेपावले, पण चिमणी भुर्रकन उडाली व ढोलीत घुसली.

"वाहव्वा! आता सापडली माझ्या तावडीत!" पिल्लू मनाशी म्हणाले.

मागील पायांवर उभे राहून त्याने ढोलीत डोकावून पाहिले. अंधाऱ्या ढोलीत काळा साप रागाने फुस्स आवाज करीत होता.

पिल्लू घाबरले आणि त्याच्या अंगावरचे केस भीतीने ताठ उभे झाले. पटकन पायात शेपूट घालून ते दूर पळाले.

आणि सर्पकंठी चिमणी ढोलीतून त्याच्या पाठी फूत्कारीत होती, सापाच्या फण्याप्रमाणे मान हलवीत होती आणि तिच्या पाठीवरील काळ्या पिसांची पट्टी सापाप्रमाणे वळवळताना भासत होती.

"बापरे! किती घाबरलो मी! कसाबसा पळालो! आता चिमण्यांची शिकार कध्धी करणार नाही. त्यापेक्षा पालीला पकडावं!"

एक पाल डोळे मिटून दगडावर ऊन खात पडली होती.

पिल्लू दबत दबत तिच्याजवळ गेले आणि एकदम त्याने पालीच्या शेपटीवर झडप घातली.

पण पालीने झटका देऊन स्वतःची सुटका केली आणि दगडाखाली ती पळाली. तिची शेपूट मात्र कुत्र्याच्या पिल्लाच्या तोंडात राहिली.



पिल्लाच्या तोंडात पालीची शेपटी वळवळत होती.

पिल्लाने पालीची शेपटी थुंकून टाकली व ते पालीच्या पाठी धावले. पण ती केव्हाच दगडाखाली दडून बसली होती व नवी शेपटी काढत होती.

"अरेच्चा! ही पालसुद्धा माझ्या तावडीतून निसटली! त्यापेक्षा लहान कीटकांनाच पकडावं!" पिल्लाने मनाशी विचार केला.

त्याने सर्वत्र नजर फिरविली. जमिनीवर शेणकिडे तुरूतुरू धावत होते, गवतात नाकतोडे उड्या मारीत होते, पानांवर टोके रांगत होते आणि फुलपाखरे उडत होती.

त्यांना पकडण्यासाठी पिल्लू झेपावले, पण अचानक सर्वत्र जादूच्या चित्राप्रमाणे घडले: सगळे कीटक तर तेथेच होते, पण नजरेला मात्र कुणीही दिसत नव्हते. सगळे लपले.

हिरवे नाकतोडे हिरव्या गवतात लपले.

टोके फांद्यांलगत चिकटले आणि त्यांनी हालचाल बंद केली. त्यामुळे फांदी कोणती आणि टोके कोणते तेच समजेना.

फुलपाखरे पंख मिटवून झाडांवर बसली. काहीच कळत नव्हते: कुठे झाडाची साल, कुठे पाने आणि कुठे फुलपाखरे!



फक्त एक चढाईखोर शेणकिडा मात्र जमिनीवरून चालत होता आणि तो कुठेही लपण्याचा प्रयत्न करीत नव्हता.





कुत्र्याचे पिल्लू धावत धावत त्या किड्यापाशी पोहोचले. त्या किड्यावर ते झडप घालणार, तोच शेणकिड्याने आपली दुर्गंधीने भरलेली लाळेची बारीक धार पिल्लाच्या नाकावर उडवली.

पिल्लू एकदम केकाटले व पायात शेपूट घालून धूम मागे पळाले. एका दमात त्याने मैदान ओलांडले व फाटकाखालून अंग चोरून अंगणात घुसले.

स्वत:च्या लाकडी खोपटात ते पिल्लू घाबरून बसले. आता बाहेर तोंड काढायचीसुद्धा त्याला भीती वाटत होती.

आणि सगळे प्राणी, पक्षी, कीटक परत आपापल्या उद्योगां-मध्ये गर्क झाले.



